ज्येष्ठता सूची

**वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ) या संवर्गातील अधिकाऱ्यांची दि. १.१.२०१४ स्थित अंतिम ज्येष्ठता सूची.**

## महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
**शासन परिपत्रक क्रमांकः मावज-२०१४/प्र.क्र.१५७/३४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १६ सप्टेंबर, २०१४

वाचा :-

१) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०११/ प्र.क्र.२८४/का.-१२, दि. २१.१०.२०११**
२) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१३/प्र.क्र.२२९/३४-अ, दि. २८.११.२०१३.**

**शासन परिपत्रक :-**

शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचाऱ्यांची ज्येष्ठतासूची प्रत्येक वर्षी तयार करणे व प्रसिध्द करणे याबाबतचे सर्वंकष धोरण संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहे. त्यानुसार आधीच्या वर्षी ज्येष्ठता अंतिमरित्या प्रसिध्द केल्यानंतर पुढील वर्षात केवळ नियमित पदोन्नती, सरळसेवा वा अन्य विहित मार्गाने नियुक्त झालेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांचा समावेश असलेली तात्पुरती अतिरिक्त ज्येष्ठतासूची तयार करावयाची आहे. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ) या संवर्गाची दि. १.१.२०१३ पर्यंतची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेली आहे. सदर संवर्गात दि. १.१.२०१३ ते दि.३१.१२.२०१३ या कालावधीत कोणीही अधिकारी पदोन्नती, सरळसेवा वा अन्य विहित मार्गाने नियुक्त झालेला नाही. त्यामुळे संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनेनुसार वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ) यांची दि. १.१.२०१३ ते दि.३१.१२.२०१३ या कालावधीची तात्पुरती अतिरिक्त ज्येष्ठतासूची तयार करण्यात आलेली नाही.

२. वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ) या संवर्गाची दिनांक १.१.२०१४ ची ज्येष्ठतासूची अंतिम करण्यात येत आहे. सदर ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत परिशिष्ट-अ येथे जोडण्यात आली आहे. सदर ज्येष्ठतासूची सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/का.१२, दि.२१.१०.२०११ मधील सूचनांनुसार तयार करण्यात आलेली आहे.

३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने आपल्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये व वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ) या संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांना सदर ज्येष्ठतासूचीची प्रत शासनाच्या संकेत स्थळावरुन उपलब्ध करुन घेण्याबाबत कळवावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०९१६१६३५४८८९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nikita N Jaitpal

Digitally signed by Nikita N Jaitpal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nikita N Jaitpal
Date: 2014.09.16 16:32:25 +05'30'

**(निकिता. नि. जैतपाल)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, ९ वा मजला, नवीन गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१,
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. संचालक (माहिती/प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
४. निवडनस्ती.

परिशिष्ट - अ

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ) संवर्गातील अधिकाऱ्यांची

दिनांक १.१.२०१४ ची अंतिम ज्येष्ठता सूची

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | प्रवर्ग | जन्मदिनांक | नियुक्ती दिनांक/ पदोन्नती दिनांक | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवेने/मर्यादीत विभागीय परीक्षेव्दारे नियुक्त उमेदवारांचा गुणवत्ता क्रमांक व परीक्षेचे वर्षे) | ज्येष्ठता दिनांक/ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.वि. आ.कुडके | वि.जा.-(अ) | २४.२.१९६२ | १९.१.२०१० | पदोन्नती | १९.१.२०१० | २८.२.२०२० | -- |
| २ | श्री.यु.हि.ठाकूर | अ.ज. | ५.८.१९६० | ३०.१२.२०१० | पदोन्नती | ३०.१२.२०१० | ३१.८.२०१८ | -- |
| खंड दिनांक १.१.२०१२ ते दि. ३१.१२.२०१२ | | | | | | | | |
| निरंक | | | | | | | | |
| खंड दिनांक १.१.२०१३ ते दि. ३१.१२.२०१३ | | | | | | | | |
| निरंक | | | | | | | | |

वि.जा. -- विमुक्त जाती

अ.ज. -- अनुसूचित जमाती